**मौजे जनूना कं. नं. ४४७ ता. खामगाव, जि. बुलढाणा येथिल ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टर उभारण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.डल्ब्युएलपी ०२.२३/प्र.क्र.४७/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
२. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्रमांक :- डब्ल्युएलपी ०६.२१/प्र.क्र. १३५/फ-१, दिनांक २५.०३.२०२२.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे यांचे पत्र क्रमांक कक्ष-२४/लेखा/प्र.क्र. ४२ (२२-२३)/८२९/२०२२-२३, दिनांक २०.१२.२०२२

**प्रस्तावना:-**

मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष, राज्य वन्यजीव मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वन्यजीव मंडळाच्या दिनांक ०४.१२.२०२० रोजी पार पडलेल्या १६ व्या बैठकीत महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टर स्थापित करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे.

मौजे जनूना कं. नं. ४४७ ता. खामगाव, जि. बुलढाणा येथे ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टरचे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या रु. १०४५.७० लक्ष इतक्या रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अनुषंगाने खालील अटींच्या अधिन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

I. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करावी.
II. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
III. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
IV. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियमातील तरतूदींचा भंग होणार नाही, तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक :- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक २०.०९.२०१९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४ (१), १३४(२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११८२१०३९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM
SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.03.01 18:24:49 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),अमरावती.
५. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), बुलढाणा.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

****